**राज्यातील पर्यावरण सुधारण्यासाठी राज्यात प्लास्टीकच्या वापरावर आलेले निर्बंध त्यामुळे उपलब्ध होणाऱ्या निरुपयोगी प्लास्टीक वस्तूचा (Waste Plastic) वापर राज्यातील रस्त्यांच्या डांबरीकरणाच्या कामासाठी अनिवार्य करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- संकीर्ण २०१६/प्र.क्र.२८७/रस्ते-१**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : २१ जून, २०१८.

**<u>वाचा:</u>** (१) पर्यावरण विभाग अधिसुचना, दिनांक २३ मार्च २०१८.
(२) सि.एस.आय.आर.-केंद्रीय सडक अनुसंधान संस्था, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.सि.आर.आर.आय/टी.एम.बी.डी/डब्ल्यु.पी/पी.डब्ल्यू.डी./१५, दि.५/१/२०१६
(३) भुतल परिवहन मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.आर.डब्ल्यु-एन.एच-३३०४४/२४/२०१५-एस अँड आर (आर), दि.९/११/२०१५
(४) ग्रामीण विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.पी-१००२१/२/२००७-टेक, दि.१३/११/२०१५.

**<u>प्रस्तावना:</u>**

राज्य शासनाने राज्यात सर्वत्र प्लास्टीक बंदीचे धोरण स्विकारले आहे. यामुळे पर्यावरणाची होणारी हानी टाळण्यास मोठा हातभार लागणार आहे. तथापि, ही प्लास्टीक बंदी अंमलबजावणी करताना मोठया प्रमाणात सद्यस्थितीत उपलब्ध असलेल्या प्लास्टीक वस्तु तसेच औद्योगिक वापरात असलेले प्लास्टीक निरुपयोगी होणार आहे. हे निरुपयोग प्लास्टीक रस्त्याच्या डांबरीकरणाच्या कामात कोरडया पध्दतीने (Dry Process) द्वारे वापरल्यास डांबरीकरणाची कामे कमीतकमी किंमतीत चांगल्या गुणवत्तेवर होतात, असे केंद्र शासनाच्या निदर्शनास आले आहे. केंद्र शासनाने त्यांच्या संदर्भाधीन परिपत्रक दिनांक ९ नोव्हेंबर, २०१५ अन्वये निरुपयोगी प्लास्टीकचा वापर डांबरीकरणाच्या वरच्या थरात करणे (Hot Mix पध्दतीने डांबरीकरण) अनिवार्य व बंधनकारक केले आहे. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य आणि मुख्यमंत्री कार्यालयाने या संदर्भात आढावा घेऊन, डांबरीकरणाच्या कामामध्ये जास्तीत जास्त निरुपयोग प्लास्टीकचा वापर करावा, असे सूचित केले आहे.

मा. मुख्य सचिव कार्यालयाने, मा. प्रधानमंत्री महोदयांनी दि.२५/५/२०१६ रोजीच्या प्रगती व्हिडीओ कॉन्फरन्सिंग मध्ये विविध राज्याकडून रस्ते बांधण्यासाठी वापरण्यात येणाऱ्या डांबरामध्ये प्लास्टीक मिसळल्यामुळे, रस्त्याचा दर्जा सुधारला असून, प्लास्टीक कचऱ्याची समस्या सुटण्यास मदत झाल्याचे निदर्शनास आल्याचे नमुद केले आहे. यामुळे मा. प्रधानमंत्र्यांनी राज्यांना रस्ते बांधणीत वापरावयाच्या डांबरामध्ये निरुपयोगी प्लॅस्टीकचा वापर करणे या पर्यायाचा विचार व्हावा, असे सूचित केले आहे. मा.प्रधानमंत्री यांनी केलेल्या सुचनेप्रमाणे कार्यवाही करण्याचे निर्देश मा.मुख्य सचिव यांनी दिले आहेत.

या सूचनांना अनुसरुन सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत यापुर्वीच दि.२/२/२०१६ रोजीच्या शासन पत्राद्वारे सर्व मुख्य अभियंता यांना त्यांच्या कार्यक्षेत्रामधील काम निरुपयोगी प्लॅस्टीकचा वापर डांबरामध्ये करुन प्रायोगिक तत्वावर हाती घेण्याबाबत सूचना निर्गमित केल्या आहेत.

उपरोक्त विषयासंदर्भात सि.एस.आय.आर.-केंद्रीय सडक अनुसंधान संस्था, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.सि.आर.आर.आय./टी.एम.बी.डी/डब्ल्यु.पी/पी.डब्ल्यू.डी./१५, दि.५/१/२०१६ सार्वजनिक बांधकाम विभागास प्राप्त झाले आहे. या पत्राच्या व संदर्भाखाली दर्शविलेल्या अन्य पत्रांच्या प्रती शासनाच्या दि.२/२/२०१६ रोजीच्या शासन पत्राच्या सोबत सर्व मुख्य अभियंता यांच्याकडे पाठविण्यात आल्या आहेत.

उपरोक्त पत्रान्वये केंद्र शासनामार्फत रस्त्यांच्या डांबरीकरणाच्या कामामध्ये काही प्रमाणात निरुपयोगी प्लास्टीक चा वापर करुन कामे करण्याबाबत कार्यवाही करण्यात येत असल्याचे नमूद करण्यात आले आहे. यासाठी प्रामुख्याने निरुपयोगी प्लास्टीकचा वापर करण्यात येत आहे. अशा पध्दतीने केलेल्या कामांची पाहणी करुन सदर पध्दतीने कामे कमी किंमतीत व चांगल्या गुणवत्तेची होत असल्याची खात्री सीएसआयआर या केंद्र शासनाच्या संस्थेने केली आहे. त्यामुळे या संदर्भात भुतल परिवहन मंत्रालयाने दि.९/११/२०१५ व ग्रामीण विकास मंत्रालयाने दि.१३/११/२०१५ रोजीच्या पत्रान्वये या संबंधाने मार्गदर्शक सुचना निर्गमित केल्या आहेत. त्यानुसार केंद्र शासनामार्फत रस्ते बांधकाम करताना डांबरीकरणाच्या कामासाठी (waste plastic) वापरण्यात येत आहे. सद्य:स्थितीत नगरपालिका क्षेत्राच्या जवळपासच्या परिसरातील कामे अशा पध्दतीने करण्यात येत असल्याचे दिसून येते.

या संदर्भात सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिपत्याखालील सर्व येणाऱ्या सर्व रस्त्यांच्या व डांबरीकरणाच्या कामामध्ये निरुपयोगी प्लास्टीकचा वापर करणे अनिवार्य करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती या संदर्भात सखोल अभ्यासाअंती शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**<u>शासन निर्णय:-</u>**

महाराष्ट्र राज्यातील सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिपत्याखालील सर्व विशेष राज्य मार्ग, राज्य मार्ग आणि प्रमुख जिल्हा मार्गावरील डांबरीकरणाच्या (मूळ बांधकामे/नूतनीकरण) सर्व कामामध्ये निरुपयोगी प्लास्टीक (waste plastic) /Industrially recycle plastic) वापरुन डांबरीकरणाची कामे करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. डाबरीकरण करीत असताना सर्व कामांमध्ये निरुपयोगी प्लास्टीक वापरणे आता अनिवार्य करण्यात येत आहे.

१. डांबरीकरणाच्या कामातील भागासाठी वेस्ट प्लास्टीकचा (निरुपयोगी प्लॅस्टीकचा) वापर करण्यात यावा.
२. भारत सरकारने निर्गमित केलेल्या दि.९/११/२०१५ व दि.१३/११/२०१५ रोजीच्या पत्रामधील सूचनांप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.
३. सदर बाबींप्रमाणे काम करत असताना भारतीय रस्ते महासभेने प्रकाशित केलेल्या IRC:SP:९८-२०१३-Guidelines for use of Waste Plastic in bituminous mixes (dry process) in wearing courses आणि Specifications for rural roads: First edition-२०१४ clause ५१२ मध्ये देण्यात आलेल्या मार्गदर्शक सुचनांचाही अवलंब करावा.
४. काम पूर्ण झाल्यावर प्रत्येक ३ महिन्यांनी कामाच्या दर्जाबाबत वेळोवेळी तपासणी करण्यात यावी व एक वर्षाच्या कालावधीनंतर या कामांबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

उपरोक्त सुचनांप्रमाणे सर्व कार्यकारी अभियंता, सर्व उप अभियंता आणि अधीक्षक अभियंता यांनी नकाशे व अंदाजपत्रके तयार करताना निरुपयोगी प्लास्टीकची तरतूद अंदाजपत्रक तसेच कंत्राटाच्या बाबींमध्ये करावी. हे सर्व निम्न-स्तरीय अधिकारी निरुपयोगी प्लास्टीकचा वापर डांबरीकरणाच्या कामामध्ये करीत आहेत किंवा कसे यावर मुख्य अभियंता यांनी संनियंत्रण करावे व शासनास त्रैमासिक अहवाल सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०६२११५३५४१०७१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by PATIL KHANDERAO TUKARAM
Date: 2018.06.21 15:48:45 +05'30'

**( खं. तु. पाटील )**
**उप सचिव (रस्ते)**

**प्रत,**

१. सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक प्रादेशिक विभाग
२. सर्व अधीक्षक अभियता, सार्वजनिक प्रादेशिक विभाग,
३. सर्व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक प्रादेशिक विभाग/जिल्हा परिषद विभाग.
४. सर्व तांत्रिक अधिकारी, सार्वजनिक प्रादेशिक विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.